राज्यातील खरीप- २०१८ हंगामातील दुष्काळी परिस्थितीच्या अनुषंगाने बाधित शेतकऱ्यांना वाटप करण्यासाठीदुसऱ्या हप्त्याचा निधी उपलब्ध करून देण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एससीवाय-२०१८/प्र.क्र.८९/म-७**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : १४ फेब्रुवारी, २०१९

**संदर्भ :-** १) शासन निर्णय क्रमांक :- एससीवाय-२०१८/प्र.क्र.८९/म-७, दिनांक :- ३१.१०.२०१८
२) शासन निर्णय,क्रमांक:- सीएलएस २०१५/प्र.क्र.४०/म-३, दिनांक १३.०५.२०१५
३) शासन निर्णय क्रमांक:- एससीवाय-२०१९/प्र.क्र.१९/म-७, दिनांक २५.०१.२०१९

**प्रस्तावना :-**

दुष्काळ व्यवस्थापन संहिता २०१६ नुसार जिल्ह्यातील दुष्काळी परिस्थितीचे मुल्यांकन करुन राज्यातील १५१ तालुक्यांमध्ये गंभीर/मध्यम स्वरुपाचा दुष्काळ जाहीर करण्यात आला आहे. सदर १५१ तालुक्यांमधील दुष्काळी परिस्थितीमुळे शेतीपिकांचे नुकसान झाल्याने बाधित झालेल्या शेतकऱ्यांना मदत देण्यासाठी संदर्भाधीन शासन निर्णयान्वये रू. २९०९५१.०९ लक्ष निधी वितरित करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. या निधीपैकी पहिल्या हप्त्यापोटी रू १४५४७५.५४ लक्ष निधी क्षेत्रीय स्तरावर वितरित करण्यात आला आहे. या निधीमधील ८०% निधी खर्च झाल्यानंतर दुसऱ्या हप्त्याची रक्कम वितरित करण्याची अट संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णयामध्ये विहित करण्यात आली आहे. सदर अट शिथील करून दुसऱ्या हप्त्याची रू. १४५४,७५,५४,६८०/- (रूपये एक हजार चारशे चौपन्न कोटी पंचाहत्तर लक्ष चौपन्न हजार सहाशे ऐंशी फक्त) रक्कम क्षेत्रीय स्तरावर वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील खरीप हंगाम २०१८ मध्ये संदर्भाधीन शासन निर्णयान्वये दुष्काळ जाहीर करण्यात आलेल्या राज्यातील १५१ तालुक्यांमधील शेतीपिकांच्या झालेल्या पीक नुकसानीसाठी बाधित शेतकऱ्यांना निविष्ठा अनुदानाचे वाटप करण्यासाठी निधी वितरित करण्यात आला आहे. दुष्काळी निधीच्या मदत वाटपामध्ये बाधा येवू नये यासाठी संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक १२ मधील उपपरिच्छेद क्रमांक ३ मधील "***तसे केल्याचे प्रमाणपत्र व किमान ८०% निधीचा विनियोग केल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्रासह पुढील हप्ताची मागणी तात्काळ***

***शासनाकडे करण्यात यावी***' ही अट शिथील करून दुसऱ्या हप्त्यापोटी रु.१४५४,७५,५४,६८०/-(रूपये एक हजार चारशे चौपन्न कोटी पंचाहत्तर लक्ष चौपन्न हजार सहाशे ऐंशी फक्त) इतका निधी जिल्हयांना वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णयातील अटी व शर्ती कायम राहतील.

३. दुष्काळी अनुदानाचे वाटप करण्यासाठी यापूर्वी वितरित करण्यात आलेल्या व आता वितरित करण्यात येणाऱ्या रकमेच्या ०.२५% रक्कम प्रशासकीय खर्च देय राहील. यापैकी आवश्यक रक्कम प्रशासकीय खर्चासाठी जिल्हाधिकारी यांनी क्षेत्रीय यंत्रणांना उपलब्ध करून दयावा. वितरित करण्यात आलेल्या निधीमध्ये प्रशासकीय खर्च अंतभूत आहे.

४. या प्रयोजनासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक सी-६, प्रधान लेखाशीर्ष - २२४५, नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०१, अवर्षण (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च (९१) (०५) पीक नुकसानीमुळे शेतकऱ्यांना मदत (२२४५ २४३४), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षी उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

५. सदर प्रकरणी वर नमूद केलेला निधी वितरीत करण्यास वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक:६९/व्यय-९/२०१९, दिनांक १३.२.२०१९ अन्वये सहमती दिली आहे.

६. सदरहु आदेश हे प्रशासकीय मान्यतेचे असून निधी वितरीत करण्याबाबतचे स्वतंत्र आदेश निर्गमित करण्यात येतील.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०२१४१७१६४५०४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2019.02.14 17:19:18 +05'30'

**( सुभाष उमराणीकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई
२. सर्व लोकसभा सदस्य / राज्यसभा सदस्य (महाराष्ट्रातील)
३. सर्व विधानसभा सदस्य / विधान परिषद सदस्य.
४. मा.मुख्य सचिव यांचे उप सचिव
५. अपर मुख्य सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,

६. अपर मुख्य सचिव (महसूल), महसुल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई
७. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. अपर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन),मंत्रालय,मुंबई
९. सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय,मुंबई-३२
१०.आयुक्त ( कृषि ),कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
११.महालेखापाल -१ /२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र , मुंबई / नागपूर
१२. महालेखापाल -१ /२ ( लेखा परिक्षा ), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
१३. सर्व विभागीय आयुक्त
१४. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१५. सर्व जिल्हाधिकारी
१६. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१७. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१९. वित्तिय सल्लागार व सहसचिव, मदत व पुनर्वसन, नवीन प्रशासन भवन, मुंबई
२०. वित्त विभाग, (व्यय -९ / अर्थसंकल्प कक्ष / अर्थोपाय कक्ष ), मंत्रालय, मुंबई.
२१. महसुल व वन विभाग, (म-७ / म११ / म-३), मंत्रालय, मुंबई-३२
२२. निवड नस्ती, म-७ कार्यासन.